**साथरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत औषधे खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खरेदी-२०१६/प्र.क्र. ३८६/आरोग्य-८**
नविन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रुग्णालय कंपांउंड,
कॉम्पलेक्स बिल्डींग, १० वा मजला, मुंबई ४००००१
दिनांक: १८ नोव्हेंबर, २०१६

संदर्भ-

१) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक संआसे/ साथरोग कक्ष-६/औषध खरेदी/प्रशासकीय मान्यता/न.क्र. ५०/१८३३-३५/२०१६, दिनांक ७.१०.२०१६

२) सहसंचालक, आरोग्य सेवा ( हिवताप,हत्तीरोग व जलजन्य रोग), पुणे यांचे पत्र क्रमांक ससंआसे/साथरोग/औषध खरेदी/प्रशासकीय मान्यता/कक्ष-५८/३०२८९-९५/२०१६, दिनांक ३.१०.२०१६

प्रस्तावना -

सहसंचालक, आरोग्य सेवा (हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग), पुणे या कार्यालयामार्फत राज्यातील साथरोग परिस्थितीचे संनियंत्रण केले जाते. साथरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत प्रामुख्याने जलजन्य आजार, अतिसार, गॅस्ट्रो, विषमज्वर, जलजन्य काविळ, लेप्टोस्पायरोसीस तसेच स्वाईन फ्ल्यू आजाराच्या नियंत्रणासाठी औषधी व साहित्यसामुग्री खरेदी करण्यात येते. सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये सदरहु औषधे खरेदी करण्यासाठी आर्थिक तरतुद मंजुर करण्यात आली आहे. सदर अनुदानातून साथरोग नियंत्रण कार्यक्रमांकरिता औषधे खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत संदर्भीय पत्रान्वये प्रस्ताव प्राप्त झाला आहे. त्यानुसार सदरहु औषधे खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

आरोग्य सेवा संचालनालयाने संदर्भीय दिनांक ७.१०.२०१६ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने साथरोग नियंत्रण कार्यक्रमांकरिता सोबतच्या **विवरणपत्रात (विवरणपत्र-अ,ब,क व ड )** दर्शविण्यात आलेल्या औषधांची खरेदी करण्यासाठी निविदा प्रक्रिया करण्यास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) सदरहू औषधांची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी.

२) सोबतच्या **विवरणपत्र-अ** मधील औषधांच्या खरेदीसाठी होणारा खर्च "२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य- राज्य योजनांतर्गत योजना-(०१) (४५) साथरोग नियंत्रण कार्यक्रम- २१, पुरवठा व सामग्री ( २२१० ४२८६)" या लेखाशिर्षांअंतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३) सोबतच्या **विवरणपत्र-ब** मधील औषधांच्या खरेदीसाठी होणारा खर्च "२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य- (०१) (०६) पटकी नियंत्रण कार्यक्रम (राज्य क्षेत्र)- २१, पुरवठा व सामग्री (२२१० ०६२९)" या लेखाशिर्षांअंतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४) सोबतच्या **विवरणपत्र-क** मधील औषधांच्या खरेदीसाठी होणारा खर्च "२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य- (०४) (०३) गुप्त रोग चिकित्सालय - २१, पुरवठा व सामग्री ( २२१० ०२०८)" या लेखाशिर्षांअंतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५) सोबतच्या **विवरणपत्र-ड** मधील औषधांच्या खरेदीसाठी होणारा खर्च "२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य- ०१,नागरी आरोग्य सेवा-विषमचिकित्सा, ००१, संचालन व प्रशासन, (०१) आरोग्य सेवा संचालनालय, (०१) (०२) जिल्हा वैद्यकीय अधिकारी- २१, पुरवठा व सामग्री (२२१० ०१०१)" या लेखाशिर्षांअंतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६) सदरहू औषधांचे तांत्रिक विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी व त्यानंतरच या बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रसिध्द करण्यात यावी.

७) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस २०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ३० ऑक्टोंबर, २०१५ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

८) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्रमांक ७ समोरील स्तंभ क्रमांक ६ येथील अटींची पुर्तता करण्यात यावी.

९) निविदा प्रक्रिया पुर्ण झाल्यांनतर केंद्रीय खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानूसार सदरहू प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११८१२२३२५९८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Sumant Kulkarni

Digitally signed by Ganesh Sumant Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ganesh Sumant Kulkarni
Date: 2016.11.18 16:24:54 +05'30'

( ग.सु.कुलकर्णी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
४) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५) सहसंचालक, आरोग्य सेवा ( हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग), पुणे
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर
८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०) अधिक्षक, प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे /रत्नागिरी/पुणे/नागपूर
११) निवडनस्ती (आरोग्य-८)

शासन निर्णय क्रमांकः खरेदी-२०१६/प्र.क्र. ३८६/आरोग्य-८, दिनांक १८ नोव्हेंबर, २०१६ सोबतचे विवरणपत्र

विवरणपत्र-अ

| अ.क्र | औषधाचे नाव | प्रस्तावित खरेदीची संख्या |
|---|---|---|
| १ | Oral Rehydration Salt Powder WHO Formula 20.5 gms Sachet [32.1] | 49,00,000 |
| २ | Ringer Lactate I.V 500ml Bottle [262.1] | 4,49,000 |
| ३ | Sodium Hypochlorite Solution 200 ml [428.1] | 2,10,000 |
| ४ | Sodium Hypochlorite Solution 5000 ml [428.2] | 13,000 |
| ५ | Furazolidone Tab 100 mg [121.1] | 1,05,42,550 |
| ६ | Doxycycline Cap 100 mg [65.1] | 1,03,00,000 |
| ७ | Metronidazole Tab 200 mg [ 78.1] | 99,00,000 |
| ८ | Norfloxacin Tab 400 mg [87.1] | 32,45,229 |
| ९ | Ciprofloxacin tab 250 mg [69.1] | 66,00,000 |
| १० | Ofloxacin Tab 200 mg {77.1} | 29,00,000 |
| ११ | Oseltamivir Phosphate Syp.75 ml [546.03] | 5,000 |
| १२ | Tinidazole Tab 300 mg [89.1] | 29,00,000 |
| १३ | Metronidazole I.V. Inj 500 mg 100 ml Bottle [78.4] | 1,65,000 |
| १४ | Dicyclomine Hydrochloride Tab 10 mg [371.1] | 99,00,000 |
| १५ | Ranitidine Tab 150 mg [24.2] | 99,00,000 |
| १६ | Ceftriaxone Inj 1gm vial [60.2] | 1,65,000 |
| १७ | Domperidone Tab 10 mg [28.1] | 66,00,000 |
| १८ | Zinc sulphate DT 20 mg [33.2] | 99,00,080 |
| १९ | Zinc sulphate or gluconate syrup [33.1} | 1,58,612 |
| २० | Domperidone Syrup 1 mg /ml 30 ml [28.2] | 2,30,000 |

विवरणपत्र-ब

| अ.क्र | औषधाचे नाव | प्रस्तावित खरेदीची संख्या |
|---|---|---|
| १ | Doxycycline Cap 100 mg [65.1] | 29,95,041 |

## विवरणपत्र-क

| अ.क्र | औषधाचे नाव | प्रस्तावित खरेदीची संख्या |
|---|---|---|
| १ | Ceftriaxone Inj 1gm vial [60.2] | 14,802 |

## विवरणपत्र-ड

| अ.क्र | औषधाचे नाव | प्रस्तावित खरेदीची संख्या |
|---|---|---|
| १ | Tinidazole Tab 300 mg [89.1] | 1,70,213 |